**राज्यातील चर्मकार समाजातील जातीचा सामाजिक, आर्थिक, शैक्षणिक सद्यस्थितीचा अभ्यास व पहाणी करून त्यांच्या विकासासाठी उपाययोजना सुचविण्याकरिता राज्यस्तरीय संत रोहिदास चर्मकार कल्याण आयोग स्थापन करण्याबाबत ..**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्र. सी.बी.सी.१०/२०१७/प्र.क्र.२३४/मावक**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०३ नोव्हेंबर, २०१८

**प्रस्तावना:-**

शासनाच्या अनुसूचित जातीविषयक कल्याणकारी धोरणाचा चर्मकार समाजाला उचित प्रमाणात लाभ पोहचविणे, हा समाज सामाजिक, आर्थिक, शैक्षणिक कार्यक्रम व योजना यापासून वंचित राहु नये, यासाठी चर्मकार समाजाचा, सामाजिक, आर्थिक, शैक्षणिक विकास करणे व सर्व प्रकारचे सामाजिक अन्याय व शोषण यापासून त्यांचे संरक्षण करण्याकरीता शासनास शिफारशी करण्यासाठी एक राज्यस्तरीय आयोग गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :

राज्यातील चर्मकार समाजातील जातीचा सामाजिक, आर्थिक, शैक्षणिक सद्यस्थितीचा अभ्यास व पहाणी करून त्यांच्या विकासासाठी शासनास उपाययोजना सुचविण्याकरिता खालीलप्रमाणे आयोग गठीत करण्यात येत आहे.

१. सदर आयोगाचे नाव " संत रोहिदास चर्मकार कल्याण आयोग " असे राहील.
२. श्री.वाय.सी.पवार (I.P.S.), सेवानिवृत्त पोलीस महानिरीक्षक हे आयोगाचे अध्यक्ष असतील.
३. सदर आयोगाचा कालावधी स्थापनेपासून एक वर्षाचा राहील.सदरहू कालावधीत आयोगाने आपला अहवाल शिफारशीसह शासनास सादर करावा.
४. आयोगाचे अध्यक्ष यांना राज्यमंत्र्याचा दर्जा देण्यात येत आहे. आयोगाचे अध्यक्ष यांना दरमहा मानधन महाराष्ट्र राज्याच्या सचिवांना अनुज्ञेय असलेल्या वेतनाप्रमाणे प्रतिमाह देण्यात येईल. तसेच मानधनाचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील, आयोगाचे अध्यक्ष, यांना वित्त विभागाचा शासन निर्णय, क्रमांक:-शासाउ-१०.१०/प्र.क्र.९६/सा.ऊ.,दि.१३.०३.२०१२ अन्वये अनुज्ञेय असलेले भत्ते व सोयी सुविधा देय असतील.
५. अध्यक्ष यांना वाहन उपलब्ध करुन देण्यात येईल व सदर वाहन राज्यात दौ-यासाठी वापरता येईल.सदर वाहन व वाहनचालक संत रोहिदास चर्मोदयोग व चर्मकार विकास महामंडळ, मुंबई , यांनी उपलब्ध करुन दयावे.
६. राज्यातील चर्मकार आयोगाची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील.
   १. राज्यातील चर्मकार समाजाचा सामाजिक, आर्थिक, शैक्षणिक स्थितीचा अभ्यास करणे.
   २.राज्यातील चर्मकार समाजाचा वरील सर्व क्षेत्रातील समस्यांचा अभ्यास करणे.
   ३.राज्य शासनाच्या विविध धोरण ,कार्यक्रम व योजना यांचा चर्मकार समाजाला किती लाभ झाला याचा आढावा घेणे.

४.राज्यातील चर्मकार समाजाचा सामाजिक ,आर्थिक, व शैक्षणिक विकास करण्याच्या दृष्टीने त्या समाजाचे सर्वेक्षण करुन त्यांची माहिती घेणे.

५. सदर आयोग वरील प्रयोजनार्थ सर्वेक्षण किंवा इतर वर्गातून माहिती घेईल किंवा सामाजिक संस्था/ व्यक्ती/ लोकप्रतिनिधी यांची सुनावणी आयोजित करुन त्यांचे मत जाणून घेईल.

उपरोक्त प्रमाणे अभ्यासाअंती शासनास राज्यातील चर्मकार समाजाच्या विकासासाठी उपाययोजनाबाबत शिफारशी सादर करतील.

६.सदय: स्थितीत सदर आयोगास लागणारा खर्च संत रोहिदास चर्मोदयोग व चर्मकार विकास महामंडळ, मुंबई यांनी त्यांच्या निधीतून खर्च करावा.

७. सदर आयोगास उपाध्यक्ष,सदस्य, सदस्य सचिव, मुख्यालय , कार्यालयाकरिता जागा, मनुष्यबळ आणि लेखाशीर्ष शासनाच्या विहित नियमानुसार इतर सोयी सुविधा उपलब्ध करून देण्याबाबत स्वतंत्ररितीने आदेश निर्गमित करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८११०३१८४३०११३२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dinesh Ramchandra Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, cn=Dinesh Ramchandra Dingle
Date: 2018.11.03 18:46:37 +05'30'

**( दि.रा.डिंगळे )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
३) मा. मंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव,
४) मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय ) यांचे खाजगी सचिव,
५) सर्व विभागीय आयुक्त
६) आयुक्त समाजकल्याण पुणे
७) सर्व जिल्हाधिकारी
८) सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी
९) सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी
१०) सर्व जिल्हापरिषदांचे समाजकल्याण अधिकारी,गट-अ
११) व्यवस्थापकीय संचालक, संत रोहिदास चर्मोदयोग व चर्मकार विकास महामंडळ, मुंबई
१२) महासंचालक,महिती व जनसंपर्क महासंचालनालय,मंत्रालय,मुंबई
१३) महालेखापाल,महाराष्ट्र-१/२,(ले.व.अ.)(लेखा परीक्षा)महाराष्ट्र राज्य,मुंबई/ नागपूर
१४) अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई

१५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई

१६) वित्त विभाग (व्यय-१४/अर्थसंकल्प-३/५),मंत्रालय,मुंबई

१७) सहसंचालक,लेखा व कोषागारे(संगणक कक्ष) नवीन प्रशासन भवन ,५ वा मजला ,मुंबई

१८) सर्व मंत्रालयीन विभाग,

१९) निवड नस्ती / मावक.